पद्मभुषण क्रांतिवीर डॉ. नागनाथअण्णा नायकवडी यांच्या मौजे नागनाथनगर, ता.वाळवा, जि.सांगली येथील स्मारकाच्या टप्पा-२ च्या बांधकामाकरिता निधी वितरित करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**

**सामान्य प्रशासन विभाग,**

**शासन निर्णय क्र. स्मारक- २०२२/प्र.क्र.२१६/२९**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,

मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२,

दिनांक : १२ मार्च,२०२५

**वाचा:-**

१) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्र.स्मारक ३११७/प्र.क्र.२२६/२९,दिनांक ३०.०६.२०१८

२) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्र.स्मारक ३११७/प्र.क्र.२२६/२९,दिनांक २६.२.२०१९

३) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्र.स्मारक ३११७/प्र.क्र.२२६/२९,दिनांक ३.७.२०१९

४) जिल्हाधिकारी, सांगली यांचे पत्र क्र.गृह-१/काया-६/पोल-१/स्मारक/आरआर/१९७/२०२०, दिनांक १६.०३.२०२०

५) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्र.स्मारक ३११७/प्र.क्र.२२६/२९,दिनांक ३०.३.२०२०

६) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्र.स्मारक ३११७/प्र.क्र.२२६/२९,दिनांक ३.११.२०२०

७) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्र.स्मारक ३११७/प्र.क्र.२२६/२९,दिनांक २९.०१.२०२१

८) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्र.स्मारक ३११७/प्र.क्र.२२६/२९,दिनांक ३१.०३.२०२१

९) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्र. स्मारक ३११७/प्र.क्र.२२६/२९,दिनांक ३१.०१.२०२२

१०) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्र.स्मारक ३११७/प्र.क्र.२२६/२९,दिनांक २२.०३.२०२२

११) वित्त विभाग, शासन परिपत्रक, क्र. अर्थसं-२०२२/प्र.क्र.४३/अर्थ-३,दिनांक ०२.०४. २०२ २

१२) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्र.स्मारक ३१७७/प्र.क्र.२२६/२९, दिनांक ०२.०५.२०२२

१३) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्र.स्मारक ३१७७/प्र.क्र.२२६/२९, दिनांक २९.०७.२०२२

१४) शासन निर्णय क्र. स्मारक- २०२२/प्र.क्र.२१६/२९, दिनांक २०.०२.२०२३.

१५) शासन निर्णय क्र. स्मारक- २०२२/प्र.क्र.२१६/२९, दिनांक २०.०८.२०२४

१६) जिल्हाधिकारी, सांगली यांचे पत्र क्र.स्मारके/उपयोगिता प्र/का.१४(३)१६३/२०२४, दि.२७.०१.२०२५.

१७) जिल्हाधिकारी, सांगली यांचे पत्र क्र.स्मारक/निधी मागणी/का.१४(३)४७८/२०२५, दि.०७.०३.२०२५.

**प्रस्तावना:-**

पद्मभुषण क्रांतिवीर डॉ. नागनाथअण्णा नायकवडी यांच्या मौजे नागनाथनगर,ता.वाळवा, जि. सांगली येथील स्मारकाच्या टप्पा-२ च्या बांधकामाकरीता शासन निर्णय क्रमांक स्मारक ३११७/ प्र.क्र.२२६/२९, दिनांक ३०.०६.२०१८ अन्वये रु. १०,३१,००,०००/- इतक्या रकमेच्या आराखडे व अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता देण्यात आली आहे. त्यानुसार शासन निर्णय दिनांक २६.२.२०१९ अन्वये रु. ८०,००,०००/-, शासन निर्णय दिनांक ३.७.२०१९ अन्वये रु. १,५०,००,०००/-, शासन निर्णय दिनांक ३.११.२०२० अन्वये रु.३४,३२,५००/-,शासन निर्णय दिनांक २९.१.२०२१ अन्वये रु.१,३७,३०,०००/-, शासन निर्णय दिनांक ३१.०३.२०२१ अन्वये रु. ७५,००,०००/-, शासन निर्णय दिनांक ३१.०१.२०२२ अन्वये रु. ५५,१३,०००/-, शासन निर्णय दिनांक २२.०३.२०२२ अन्वये रु. ३१,२८,५००/-,

शासन निर्णय दिनांक ०२.०५.२०२२ अन्वये रु. ५८,४०,०००/- व शासन निर्णय दिनांक २९.०७.२०२२ अन्वये रु. ५२,५९,५००/-, शासन निर्णय दिनांक २०.०२.२०२३ अन्वये रु.३९,१५,०००/- व शासन निर्णय दिनांक २०.०८.२०२४ अन्वये रु.१,५५,८०,०००/- असे एकूण रु. ८,६८,९८,५००/- इतका निधी जिल्हाधिकारी, सांगली यांना वितरित करण्यात आला आहे. या निधीची उपयोगिता प्रमाणपत्र प्राप्त झाली आहेत.

पद्मभुषण क्रांतिवीर डॉ. नागनाथअण्णा नायकवडी यांच्या मौजे नागनाथनगर,ता. वाळवा, जि. सांगली येथील स्मारकाच्या टप्पा-२ च्या बांधकामाकरिता जिल्हाधिकारी, सांगली यांनी संदर्भाधीन क्रमांक १७ येथील पत्रान्वये रु.१६२.०१५ लक्ष इतका निधी वितरीत करण्याची विनंती केली आहे. त्यास अनुसरुन पद्मभुषण क्रांतिवीर डॉ. नागनाथअण्णा नायकवडी यांच्या मौजे नागनाथनगर,ता. वाळवा, जि. सांगली येथील स्मारकाच्या टप्पा-२ च्या बांधकामाकरिता रु. १६२.०१५ लक्ष इतका निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :**

या शासन निर्णयाद्वारे पद्मभुषण क्रांतिवीर डॉ. नागनाथअण्णा नायकवडी यांच्या मौजे नागनाथनगर,ता. वाळवा, जि. सांगली येथील स्मारकाच्या टप्पा-२ च्या बांधकामाकरिता रु. १,६२,०१,५००/- ( रु. एक कोटी बासष्ट लक्ष एक हजार पाचशे फक्त) इतका निधी वितरित करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

२. सदरचा खर्च सन २०२४-२५ या आर्थिक वर्षात मंजूर असलेल्या तरतुदीतून भागविण्यात यावा व तो खालील लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.

मागणी क्रमांक -ए-४,
मुख्य लेखाशीर्ष, २०५९ सार्वजनिक बांधकामे
८०- सर्वसाधारण
८००- इतर खर्च
(००) (००) (०२) राष्ट्रपुरूष/थोर व्यक्ती यांची स्मारके व पुतळे यांचे बांधकाम (कार्यक्रम)
(२०५९ ३१७७), ५३ मोठी बांधकामे

३. वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र. अर्थसं-२०२४/प्र. क्र.३४/ अर्थ-३, दिनांक ०१ एप्रिल, २०२४ व क्र. अर्थसं-२०२४/प्र. क्र.८०/ अर्थ-३, दिनांक २५ जुलै, २०२४ मधील तरतुदीचे पालन करण्यात यावे. तसेच वितरीत निधी ठेव बांधकामाच्या स्वरुपात सार्वजनिक बांधकाम विभागाकडे वर्ग न करता चालू आर्थिक वर्षामध्ये स्मारकाच्या कामासाठी खर्च करण्याची जिल्हाधिकारी, सांगली यांनी दक्षता घ्यावी.

४. उपरोक्त निधीमधून खर्च करण्यासाठी जिल्हा नियोजन अधिकारी, जिल्हा नियोजन समिती, जिल्हाधिकारी कार्यालय, सांगली ( सांकेतांक क्रमांक २४०१००१०३९ ) यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. सदर निधीच्या खर्चाची, निधीचे उपयोगिता प्रमाणपत्र महालेखापाल, मुंबई यांना सादर करण्याची तसेच महालेखापालांच्या लेख्यांशी खर्चमेळ घालण्याची जबाबदारी जिल्हाधिकारी, सांगली यांची राहील.

५. हा शासन निर्णय, प्रशासकीय विभागांना वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८, भाग पहिला, वित्त विभाग शासन निर्णय क्र. विअप्र २०१३/प्र. क्र. ३०/२०१३/विनियम,भाग-२ दिनांक १७ एप्रिल, २०१५ अन्वये प्राप्त झालेल्या अधिकारांतर्गत किंवा त्या-त्या विभागांना वेळोवेळी वित्तीय अधिकार नियम पुस्तिका भाग-२

अन्वये प्रदान करण्यात आलेल्या वित्तिय अधिकारांतर्गत असलेल्या प्रकरणांबाबत देण्यात आलेल्या अधिकारास व वित्त विभाग, शासन निर्णय, क्र. अर्थसं-२०२४/प्र.क्र.८०/अर्थ-३, दिनांक २५ जुलै, २०२४ सोबतचे परिशिष्ट मधीलअ.क्र.९ अनुसार प्रशासकीय विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारास तसेच वित्त विभागाच्या अनौस १०७८/व्यय-४, दिनांक २५.०२.२०२५ च्या अनौपचारिक संदर्भान्वये निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२५०३१२१२५८५८४९०७ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SACHIN RAMESHCHANDRA KAWALE

Digitally signed by SACHIN RAMESHCHANDRA KAWALE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=GENERAL ADMINISTRATION DEPARTMENT, 2.5.4.20=d5062265900a410830ee382e5139a604fd984b2281b2e3afd10a6632fad19eb9, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=6A24065CA2F124D0C76C59FC9F7EEF1AEB64319AF10327AEE4A11A35BB49E2B7, cn=SACHIN RAMESHCHANDRA KAWALE
Date: 2025.03.12 13:00:03 +05'30'

**( सचिन र. कावळे )**
**अवर सचिव,महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

मा. राज्यपालांचे प्रधान सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई
मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मुख्यमंत्र्यांचे सचिवालय, मंत्रालय, मुंबई
मा.उप मुख्यमंत्री (नगरविकास व गृहनिर्माण) यांचे खाजगी सचिव,मंत्रालय, मुंबई.
मा.उप मुख्यमंत्री (वित्त व नियोजन) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
मा.पालकमंत्री, जिल्हा सांगली यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
मा.मुख्य सचिव (प्र.ना.उ. सु.), (अति.कार्य.),सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई
सचिव (बांधकामे), सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई
जिल्हाधिकारी, सांगली.
महालेखापाल (लेखापरिक्षा), महाराष्ट्र-१, मुंबई
महालेखापाल (लेखापरिक्षा), महाराष्ट्र-२ नागपूर
महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१ मुंबई
महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता ), महाराष्ट्र-२ नागपूर
जिल्हा नियोजन अधिकारी, सांगली
जिल्हा कोषागार अधिकारी, सांगली
निवासी उपजिल्हाधिकारी, सांगली
कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम (पश्चिम) विभाग, सांगली.
कक्ष अधिकारी (कार्या-२५ / कार्या-२६), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई
कक्ष अधिकारी, नियोजन विभाग (कार्यासन-१४४३), मंत्रालय, मुंबई
कक्ष अधिकारी (कार्यासन व्यय- ४), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
कार्यासन अधिकारी, (इमा-३), सार्वजनिक बांधकाम विभाग,मंत्रालय, मुंबई
निवडनस्ती (कार्यासन २९), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई.